**कारागृहाच्या शेतीचे आधुनिकीकरण करण्याकरिता लागणारी साधनसामुग्री खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एमएजे-०१२०/४/प्र.क्र.४६/पीआरएस-२.**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- १५ जानेवारी, २००२.**

<u>वाचा:-</u> १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक- शेती / तांत्रिक/वायो/ २००१-२००२/ कक्ष-९,दिनांक २९.५.२००१.

२) गृह विभाग,शासन निर्णय क्र.एमएजे-०१२०/४/प्र.क्र.४६/पीआरएस-२ दिनांक १५.११.२०००.

३) वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम दिनांक ११.७.२००१.

<u>शासन निर्णय:-</u> कारागृहाच्या शेतीचे आधुनिकीकरण करण्याकरिता लागणारी साधनसामुग्री खरेदी करण्यासाठी शासनाने दिनांक १५.११.२००१ च्या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. तथापि साधन सामुग्री खरेदी करण्यासाठी येणाऱ्या रु.२४,२३,०००/- च्या खर्चास मान्यता दयावी अशी कारागृह महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य पुणे यांनी शासनास विनंती केली आहे.

२. कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास केलेली विनंती विचारात घेऊन कारागृह शेतीचे आधुनिकीकरण करण्यासंबंधीच्या प्रस्तावातील " शेळी पालन प्रकल्प व वाहन खरेदी " हया दोन बाबी वगळून इतर साधन सामुग्री खरेदी करण्यासाठी शासन या आदेशाद्वारे तसेच वित्तिय अधिकार नियमपुस्तिका १९७८ व वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक-.विअप्र-१०००/ प्र.क्र.४६/२००१/ विनियम, दिनांक ११.७.२००१ च्या शासन निर्णयातील भाग पहिला उप विभाग तीन मधील अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७(२) (अ) व स्तंभ क्र.६ मधील अटींच्या अधीन राहून रु.२४,२३,०००/- (रु.चोवीस लक्ष तेवीस हजार फक्त ) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देत आहे.

३. यासाठी होणारा खर्च "मुख्य लेखाशिर्ष २०५६०१०६" उपशिर्ष १०१(सहा) कारागृहात करण्यात येणाऱ्या शेतीचे आधुनिकीकरण (योजनांतर्गत योजना ) ३२,यंत्र सामुग्री व साधन सामुग्री "मागणी क्र.बी-७ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा. व आर्थिक वर्ष २००१-२००२मध्ये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग,नियोजन विभाग,व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-८२४/२००१/व्यय-८,दिनांक १६.८.२००१ च्या सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( गु. ज. कुलकर्णी )
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग**

प्रति,
कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
अधिक्षक,मध्यवर्ती कारागृह येरवडा,पुणे.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.
महालेखापाल ,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा)मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.
महालेखापाल ,महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा) नागपूर.
वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय,मुंबई.
नियोजन विभाग (का.१४७५),मंत्रालय,मुंबई
सार्वजनिक बांधकाम विभाग(इमा-२)मंत्रालय,मुंबई
अवर सचिव,गृह विभाग(बीयुडी-१),मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती,पीआरएस-२.